**कृषि उन्नती योजना राष्ट्रीय अन्न सुरक्षा व पोषण अभियान अंतर्गत बियाणे घटकाच्या (पुर्वीची एसएमएसपी) वार्षिक कृती आराखड्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक कृवपदुम- १२०२७/१०६/२०२५-MAG-1A**
संगणक क्रमांक : १०९८५०३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक :- १३ मे, २०२५

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाचे पत्र F.O. No. ०३०/१३/२०२५-KY दिनांक. ३०/१२/२०२४
२. ३७ व्या SLSC मिटिंग चे इतिवृत्त No. CSS-२०२५/८.२.१४/२-१, Dtd.२६/०३/२०२५.
३. केंद्र शासनाचे पत्र क्र. २-३३/२०२४-NFSNM, दिनांक १६/०४/२०२५
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. गुनि १/२/बियाणे/एसव्हीएस२५-२६/२५/९६७१ दि.२९/०४/२०२५
५. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. गुनि १/२/केवाय/बियाणे/२५-२६/१०००४/२०२५ दि.०२/०५/२०२५

**प्रस्तावना** :-

शेतकऱ्यांना उच्चतम प्रतीचे बियाणे वेळेवर आणि माफक दरात उपलब्ध करून देण्याचे उद्देशाने बाराव्या पंचवार्षिक योजनेदरम्यान राष्ट्रीय कृषी विस्तार व तंत्रज्ञान मिशन अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उपअभियान (SMSP) सुरु करण्यात आलेले आहे. सदर अभियानाची अंमलबजावणी सन २०१४-१५ पासून सुरु झालेली आहे.

२. केंद्र शासनाच्या वित्तीय व्यय समितीच्या (EFC) शिफारसीनुसार, SMSP मधील सर्व उपघटक "कृषी उन्नती योजने" अंतर्गत "राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (NFSM)" मध्ये विलीन करण्यात आलेले असून केंद्रीय मंत्रिमंडळाने कृषी उन्नती योजनेअंतर्गत या अभियानाचा कालावधी ३१ मार्च २०२६ पर्यंत वाढवण्यास मान्यता दिलेली आहे, त्यासोबतच राष्ट्रीय अन्नसुरक्षा अभियान (NFSM) चे नाव बदलून "राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान (NFSNM)" असे करण्यात आले आहे.

३. संदर्भ क्र ३ अन्वये केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियानाच्या (NFSNM) नवीन मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत. संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये ३७ व्या राज्यस्तरीय मंजूरी समितीच्या दिनांक २४.०३.२०२५ रोजी झालेल्या बैठकीत राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान चा घटक असलेल्या बियाणे व लागवड साहित्य उपअभियानातील ग्रामबिजोत्पादन योजनेच्या २०२५-२६ च्या रुपये ४००८.२५ लाख इतक्या वार्षिक कृती आराखडयास मान्यता देण्यात आली आहे. तथापि केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान च्या सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. सुधारित मार्गदर्शक सुचनांनुसार बियाणे व लागवड साहित्य उपअभियानाचा समावेश राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियानात “बियाणे घटक” म्हणून करण्यात आला आहे. सुधारीत मार्गदर्शक सुचनांनुसार कृषि आयुक्तालयाने

संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये कृषि उन्नती योजना अंतर्गत बियाणे या घटकाखालील उपघटकांचा रु. ३८९०.७८ लाख रकमेचा सुधारित वार्षिक कृती आराखडा सादर केला आहे. त्यानुसार कृषि उन्नती योजनेअंतर्गत अंतर्गत बियाणे घटकाखालील उपघटकांचा रु. ३८९०.७८ लाख रकमेचा वार्षिक कृती आराखड्यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- कृषि उन्नती योजनेअंतर्गत राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत बियाणे घटकाखालील उपघटकांच्या, सन २०२५-२६ मध्ये राबवावयाच्या, रुपये ३८९०.७८ लाख रकमेच्या सुधारित वार्षिक कृती आराखड्यास पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर उपघटक पुढीलप्रमाणे आहेत :-

१. **बियाण्यांच्या नवीन जातींना प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय** (Assistance for fostering seeds of new varieties) (६०:४०) :-

बियाणे बदल दर (SRR) व विविधता बदल दर (VRR) यात वृद्धी करण्यासाठी, त्याचबरोबर ICAR, SAUs, CAUs इत्यादी संस्थांनी विकसित केलेल्या उच्च उत्पादक, पोषणदृष्टया समृद्ध व हवामान प्रतिरोधक नव्या बियाण्यांचा प्रसार गतीने होण्याच्या आणि जुन्या बियाण्यांचा वापर टप्याटप्प्याने कमी करण्याच्या व नव्या बियाण्यांचा बियाणे साखळीत समावेश होण्याच्या उद्देशाने "बियाण्यांच्या नवीन जातींना प्रोत्साहनासाठी अर्थसहाय" या उपघटकांतर्गत आर्थिक तरतूद उपलब्ध करून दिली जाणार आहे.

**अर्थसहायाचे घटक व अंमलबजावणीची कार्यपद्धती**

**१.१ प्रमाणित बियाण्यांवर अर्थसहाय (Assistance on Certified Seeds) (६०:४०-केंद्र:राज्य)-**

या बाबींतर्गत नव्याने प्रसारित आणि अधिसूचित करण्यात आलेल्या बियाण्यांच्या शेतकऱ्यांनी जलद स्वीकार करावा यासाठी प्रमाणित बियाण्यांच्या वितरणावर अर्थसहाय देण्यात येते.

*अ) निकष व अटी:-*

१. महाबीजने उत्पादित केलेले भात, गहू, हरभरा, तूर, मूग, उडीद या पिकांचे संकरीत किंवा सुधारित परंतु अधिसूचित केलेले बियाणे अनुज्ञेय राहील.
२. प्रमाणित बियाणांच्या वितरणावर ५०% अर्थसहाय अनुज्ञेय राहील.
३. १० वर्ष किंवा १० वर्षाच्या आतील अधिसूचित बियाणे अनुदानासाठी पात्र राहील.
४. सत्यप्रत बियाणे अनुदानासाठी पात्र राहणार नाही.
५. प्रति शेतकरी १ हेक्टर क्षेत्रमर्यादेत लाभ अनुज्ञेय राहील.
६. लाभार्थी शेतकऱ्याला सदर घटकासाठी पुढील दोन वर्षात पुन्हा अर्थसहाय देय राहणार नाही.
७. प्रमाणित बियाणांची विक्री SATHI पोर्टलवरुन करणे बंधनकारक राहील.

*ब) पीकनिहाय निर्धारित केलेले अनुदान मापदंड :-*

| अ.क्र. | पिकाचे नाव | प्रमाणित बियाणे वितरण |
|---|---|---|
| १ | भात, गहू | बियाणे रकमेच्या ५०% किंवा रु.२०००/- प्रति क्विंटल यापैकी जी कमी असेल ती रक्कम. |
| २ | हरभरा, तूर, मूग, उडीद | बियाणे रकमेच्या ५०% किंवा रु.५०००/- प्रति क्विंटल यापैकी जी कमी असेल ती रक्कम. |

*क) सन २०२५-२६ कालावधीसाठी प्रस्तावित कार्यक्रम :-*

| अ.क्र. | हंगाम | पिकाचे नाव | क्षेत्र (हे.) | बियाणे वितरण लक्षांक (क्विं.) | आर्थिक तरतूद (रु.लाख) |
|---|---|---|---|---|---|
| १ | खरीप | भात | १०२०० | ५१०० | १०२.०० |
| | | तूर | ४५००० | ४५०० | २२५.०० |
| | | मूग | ८००० | १००० | ५०.०० |
| | | उडीद | ५०४० | ६३० | ३१.५० |
| | एकूण खरीप | | ६८२४० | ११२३० | ४०८.५० |
| २ | रब्बी | गहू | ३०००० | ३०००० | ६००.०० |
| | | हरभरा | ५८६६७ | ४४००० | २२००.०० |
| | एकूण रब्बी | | ८८६६७ | ७४००० | २८००.०० |
| | एकूण (खरीप+ रब्बी) | | १५६९०७ | ८५२३० | ३२०८.५० |

प्रमाणित बियाण्यांना अर्थसहाय या योजनेच्या अंमलबजावणीसाठीची व अनुदान वितरणाची कार्यपद्धती कृषि आयुक्तालयाने विहित करावी.

**2. बियाणे गुणवत्ता नियंत्रण घटकांचे बळकटीकरण (Strengthening of Seed quality control components) (100% केंद्र शासन) : -**

या घटकांतर्गत, नवीन बीज परीक्षण प्रयोगशाळा स्थापन करण्यासाठी तसेच विद्यमान प्रयोगशाळेच्या नूतनीकरणासाठी अर्थसहाय देण्यात येते.

**२.१. विद्यमान बीज परीक्षण प्रयोगशाळांचे बळकटीकरण : -**

या उपघटका अंतर्गत पुढील बाबींसाठी अर्थसहाय देण्यात येते -

२.१.१. बीज परीक्षण प्रयोगशाळांकरिता उपकरणे खरेदीसाठी अर्थसहाय्य

२.१.२. विद्यमान बीज परीक्षण प्रयोगशाळांचे नुतनीकरण

*निकष*:-

१. बीज परीक्षण प्रयोगशाळांना NABL ची मान्यता आवश्यक राहील.
२. बीज परीक्षण प्रयोगशाळा अधिसूचित केलेली असावी, अधिसूचित केलेली नसेल तर अनुदान प्राप्तीनंतर दोन वर्षांत पूर्तता करणे आवश्यक आहे.
३. बीज परीक्षण प्रयोगशाळांचे मॅपिंग SATHI पोर्टलवर केलेले असावे.

**२.१.१. बीज परीक्षण प्रयोगशाळांसाठी उपकरणे खरेदीसाठी अर्थसहाय्य (100% केंद्र शासन):-**

१. या घटकांतर्गत कृषी आयुक्तालयाच्या अखत्यारीतील पुणे, नागपूर व परभणी येथील बीज परीक्षण प्रयोगशाळांना अनुकमे रक्कम रु. ९.०० लाख, रु. १०.०० लाख व रु. ९.५० लाख याप्रमाणे एकूण रक्कम रु. २८.५० लाख उपकरणे खरेदीच्या आराखडयास मान्यता देण्यात येत आहे. (घटकनिहाय तपशील **परिशिष्ट- अ** मध्ये पहावा)

**२.१.२. विद्यमान बीज परीक्षण प्रयोगशाळांचे नुतनीकरण (100% केंद्र शासन):-**

*निकषः*

१) क्षेत्रफळ २०० चौरस मीटर पर्यंत

२) बाबीः बांधकाम, विद्युत खर्च, पाणीपुरवठा/निचरा व इतर बाबी

३) रक्कम - रु. ५०.०० लाख किंवा प्रत्यक्ष खर्च यापैकी जे कमी असेल ती रक्कम

या योजनेअंतर्गत कृषी आयुक्तालयाच्या अखत्यारीतील पुढील दोन प्रयोगशाळांचा प्रस्तावित आराखड्यात समावेश करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बीज परीक्षण प्रयोगशाळेचे नाव | एकूण (रक्कम रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | बीज परीक्षण प्रयोगशाळा, नागपूर | ९.०० |
| २ | बीज परीक्षण प्रयोगशाळा, परभणी | ९.०० |
| | एकूण (रक्कम रु.लाखात) | १८.०० |

**२.२ आधुनिक/प्रगत आनुवंशिक शुद्धता तपासणी सुविधा (१००% केंद्र शासन) :-**

**२.२.१. DNA फिंगरप्रिंटिंग/वाण शुद्धता तपासणी प्रयोगशाळा स्थापनेसाठी अर्थसहाय्य:-**

१. बियाणे व लागवड साहित्याची अनुवंशिक (जनुकीय) शुद्धता सुनिश्चित करण्यासाठी DNA फिंगरप्रिंटिंग प्रयोगशाळा आवश्यक आहेत. सदर प्रयोगशाळा बियाणे व लागवड साहित्याची जनुकीय शुद्धता तपासण्यासाठी एक प्रगत, अचूक व जलद पद्धत आहे.
२. अर्थसहायाचे स्वरूप:-उपकरणे खरेदीसाठी रक्कम रु. २००.०० लाख किंवा प्रत्यक्षात होणाऱ्या खर्चाची रक्कम यापैकी जी कमी असेल तेवढे अर्थसहाय अनुज्ञेय असेल.

३. घटकनिहाय तपशील **परिशिष्ट-ब** मध्ये पहावा.

**२.२.२. पारंपरिक पद्धतीद्वारे शुद्धता तपासणीसाठी अर्थसहाय्य:**

2.2.2.1 **आनुवंशिक शुद्धता चाचणी सुविधा बळकटीकरण (Strengthening of Grow-Out Test Farm) (१००% केंद्र शासन):-**

*निकष:-*

१. २.०० हेक्टरसाठी रु. ५०.०० लाखपर्यंत किंवा प्रत्यक्षात होणाऱ्या खर्चाची रक्कम यापैकी जी कमी असेल तेवढे अर्थसहाय देय राहील.
२. जमीन खरेदीसाठी निधी अनुज्ञेय नाही
३. शेताच्या आकारानुसार प्रोराटा आधारावर अर्थसहाय्य देय राहील.
४. या उपघटकांतर्गत पुढील बाबींचा समावेश करण्यात आला आहे-
   (अ) केंद्राच्या एकत्रित विकासासाठी आवश्यक बांधकामे/शेड, गोदामे, पंप हाऊस, वर्कशॉप, रस्ते, कुंपण, विद्युतीकरण, खळे बांधकाम, मळणीसाठीचे बांधकाम इत्यादींची उभारणी.
   (ब) सिंचन/निचऱ्याची संरचना, पाइपलाइन, पाण्याच्या टाक्या, स्लॅब चॅनेल्स इत्यादींचा विकास.
   (क) जमीन विकास, समतलीकरण, मॅपिंग, भूप्रदेश समायोजन, बांधणी, भूखंड आराखडा तयार करणे इत्यादी.
   (ड) मोल्ड बोर्ड नांगर, डिस्क हॅरो टिलर्स, लेव्हलर्स, रिगर, बंड फॉर्मर व इतर शेती अवजारे/यंत्रसामग्री, देखभाल व दुरुस्तीच्या आवश्यक साधनांसह ट्रॉली, ट्रॅक्टर ३५ HP-१ इत्यादी.
   (ई) क्षेत्रभेटीसाठी वाहतूक सुविधा
५. घटकनिहाय तपशील **परिशिष्ट क** मध्ये पहावा.

2.2.2.2 **ग्रीन/नेट/पॉली हाऊस सुविधेसाठी (Green/Net/Poly house facility) (१००% केंद्र शासन):-**

- अर्थसहायाची रक्कम - रु. १५.०० लाख किंवा प्रत्यक्ष खर्च यापैकी जी कमी असेल ती रक्कम अनुज्ञेय राहील
- घटकनिहाय तपशील **परिशिष्ट-ड** मध्ये पहावा.

या घटकाखाली निर्माण केल्या जाणाऱ्या सुविधांचे मॅपिंग SATHI पोर्टलवर करणे बंधनकारक आहे.

**२.३ विशेष बीज आरोग्य तपासणी युनिट, Specialized Seed Health Testing unit (१००% केंद्र शासन) :-**

१. बियाणे लॉटची गुणवत्ता मुख्यत: बियाणांच्या आरोग्यावर व ताकदीवर अवलंबून असते, जे बियाणांवर रोगजंतू, कीटक व किडींची उपस्थिती तसेच प्रतिकूल हवामानात त्याची टिकून राहण्याची क्षमता दर्शवतात.
२. या योजनेअंतर्गत आधुनिक उपकरणे व इतर खर्चांसाठी एकदाच रू. ७०.०० लाख किंवा प्रत्यक्ष खर्च यापैकी जे कमी असेल ते अर्थसहाय देय राहील.

३. घटकनिहाय तपशील **परिशिष्ट-इ** मध्ये पहावा.

४. या घटकाखाली निर्माण केल्या जाणाऱ्या सुविधा SATHI पोर्टलवर नोंदवणे अनिवार्य आहे.

**२.४ क्षमता बांधणी, Capacity Building (१००% केंद्र शासन) :-**

१. देशातील बियाणे समुदाय मजबूत करण्यासाठी कुशल मनुष्यबळ आवश्यक आहे. यासाठी प्रगत तंत्रज्ञानांचे प्रशिक्षण, आधुनिक उपकरणांची हाताळणी, बीज परीक्षण पद्धती, बीज प्रमाणीकरण पद्धती आणि इतर संबंधित कार्याची माहिती असणे आवश्यक आहे. विविध क्रियांमध्ये सहभागी असलेल्या तांत्रिक अधिकाऱ्यांना/कर्मचाऱ्यांना नियमितपणे त्यांचे तांत्रिक ज्ञान/कौशल्य अद्ययावत करणे आवश्यक आहे.

२. या बाबींतर्गत खालीलप्रमाणे अर्थसहाय्य दिले जाईल.

| अ.क्र. | प्रशिक्षण व कार्यशाळा | कमाल देय रक्कम (रु.लाख) |
|---|---|---|
| १ | १ दिवसीय प्रशिक्षण (१०० प्रशिक्षणार्थी) | १.०० |
| २ | ३ दिवसीय प्रशिक्षण (५० प्रशिक्षणार्थी) | १.५० |
| ३ | ५ दिवसीय प्रशिक्षण (५० प्रशिक्षणार्थी) | २.५० |
| ४ | १५ दिवसीय प्रशिक्षण (३० प्रशिक्षणार्थी) | ४.५० |

३. *निकष*:-

अ) प्रशिक्षणार्थींची संख्या आणि प्रशिक्षण कालावधी हा अंमलबजावणी करणाऱ्या संस्थेच्या गरजेनुसार ठरवण्यात येईल.

आ) प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिवस रुपये १०००/- किंवा प्रत्यक्ष खर्च यापैकी जे कमी असेल ते अर्थसहाय देय राहील.

इ) आयोजित करण्यात आलेल्या प्रशिक्षणाचे तपशील व स्थळ कृषी मॅपर ॲपवर नोंदविले जावे.

**२.५ बियाणे कायद्यांच्या अंमलबजावणीसाठी अर्थसहाय्य - Assistance for Strengthening of Seed Law Enforcement (१००% केंद्र शासन) -**

बियाण्यांच्या गुणवत्तेबाबत जनजागृती निर्माण करण्यासाठी माहितीपुस्तिका व पत्रके (pamphlets) छपाई व वितरणासाठी रु. ५.०० लाख किंवा प्रत्यक्ष खर्च यापैकी जे कमी असेल ते अर्थसहाय देय राहील.

**3. राष्ट्रीय बियाणे राखीव (National Seed Reserve) (१००% केंद्र शासन) -**

१. बियाणे तुटवडा किंवा नैसर्गिक आपत्तीच्या काळात शेतकऱ्यांना उच्च प्रतीचे प्रमाणित व पायाभूत बियाणे वेळेवर उपलब्ध करून देणे हा राष्ट्रीय बियाणे राखीव साठ्याचा मुख्य उद्देश आहे.

२. संपूर्ण देशामध्ये विविध शासकीय संस्थांमार्फत बियाणे राखीव साठ्याचे व्यवस्थापन करण्यात येते, जेणेकरून नैसर्गिक आपत्ती अथवा अन्य आपत्कालीन परिस्थितींमध्ये प्रभावित क्षेत्रांमध्ये बियाणांचा त्वरित पुरवठा करता येईल आणि त्यामुळे कृषी क्षेत्राची पुनर्बांधणी व अन्नसुरक्षा सुनिश्चित करता येईल.

**या घटकांतर्गत प्रस्तावित बाबी-**

### ३.१ राखीव बियाण्यांच्या देखभालीचा खर्च (Maintenance Cost) :

३.१.१ यामध्ये खालील बाबींचा समावेश होतो:-

i. प्रक्रिया शुल्क, पॅकिंग साहित्य, मजुरी, प्रमाणीकरण शुल्क- ₹३००/क्विंटल किंवा प्रत्यक्ष खर्च यापैकी जे कमी असेल ते अर्थसहाय देय राहील.

ii. साठवणूक केंद्रापर्यंतचा वाहतूक खर्च, लोडिंग/अनलोडिंग व हाताळणी खर्च - २००/क्विंटल किंवा प्रत्यक्ष खर्च यापैकी जे कमी असेल ते अर्थसहाय देय राहील.

iii. गोदामाच्या ठिकाणी फ्यूमिगेशन, फवारणी, धूळमुक्त वातावरण व देखभाल खर्च -₹१०/क्विंटल किंवा प्रत्यक्ष खर्च यापैकी जे कमी असेल ते अर्थसहाय देय राहील.

**३.१.२** *निकष*:-

i. खरीप हंगाम - १५ ऑगस्टपर्यंत NSR मध्ये बियाणे ठेवले जाईल; त्यानंतर संस्थांना विक्री करता येईल.

ii. रब्बी हंगाम- १५ डिसेंबरपर्यंत NSR मध्ये बियाणे ठेवले जाईल; त्यानंतर संस्थांना विक्री करता येईल.

iii. बियाणे SATHI पोर्टलद्वारे उत्पादित असावे.

iv.केवळ प्रमाणित व पायाभूत बियाणेच पात्र असतील लघु व मध्यम कालावधीचेः तृणधान्य, भरडधान्य, पौष्टिक तृणधान्य, कडधान्य, तेलबिया, तंतू व चारा पिके इ.

V. बियाणे उत्पादन प्रणाली योग्य पिढीनुसार पार पाडलेली असावी व शासकीय/नोंदणीकृत उत्पादकांकडून उत्पादन होणे आवश्यक आहे.

vi. मागील वर्षी राज्याने दाखवलेल्या उपलब्धतेच्या केवळ १% बियाणे NSR मध्ये ठेवता येईल.

vii. केंद्र शासनाच्या बियाणे विभागाकडून लक्षांक MIS वर अपलोड केले जातील. अंमलबजावणी संस्थेने प्रत्यक्ष साठ्याचे तपशील, स्थानाचे GPS कोऑर्डिनेट्स व छायाचित्रे अपलोड करावीत. बियाण्याची विक्री कशी केली याची माहितीही MIS वर द्यावी लागेल.

३.१.३ राखीव बियाण्यांच्या देखभालीचा तपशील **परिशिष्ट ई** मध्ये पहावा.

### ४. प्रशासकीय, सनियंत्रण व मुल्यमापन खर्च : –

प्रशासकीय, सनियंत्रण व मुल्यमापन बाबीसाठी एकूण खर्चाच्या २.५ % निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. १००% केंद्र हिश्शाच्या घटकांच्या बाबतीत, प्रशासकीय खर्च २.५ % प्रमाणे पूर्णपणे केंद्र हिश्शातून देय होईल. ६०:४० गुणोत्तराच्या घटकांच्या बाबतीत २.५ % प्रमाणे प्रशासकीय खर्च केंद्र व राज्यामध्ये ६०:४० प्रमाणात विभागला जाईल.

**कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा व पोषण अभियान अंतर्गत बियाणे घटकाचा (पूर्वीची एसएमएसपी) वार्षिक कृती आराखडा**

| अ.क्र. | उपघटक | सामाजिक प्रवर्ग | वार्षिक कृती आराखडा | | | अंमलबजा-वणी यंत्रणा |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण | |
| १ | बियाण्यांच्या नवीन जातींना प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय (Assistance for fostering seeds of new varieties)- **(६०:४०)** | सर्वसाधारण(७९ %) | १५२०.८३ | १०१३.८९ | २५३४.७२ | महाबीज |
| | | अ.जाती (१२ %) | २३१.०१ | १५४.०१ | ३८५.०२ | |
| | | अ.जमाती ( ९ %) | १७३.२६ | ११५.५१ | २८८.७७ | |
| | **एकूण**- नवीन वाणांच्या बियाणांना प्रोत्साहनासाठी अर्थसहाय (Assistance for fostering seeds of new varieties)- | | **१९२५.१०** | **१२८३.४०** | **३२०८.५०** | |
| २ | बियाणे गुणवत्ता नियंत्रण घटकांचे बळकटीकरण (Strengthening of Seed quality control components)- **(१००:०)** | - | | | | |
| २.१. | विद्यमान बीज परीक्षण प्रयोगशाळांचे बळकटीकरण: | - | | | | |
| २.१.१. | बीज परीक्षण प्रयोगशाळांसाठी उपकरणे खरेदीसाठी अर्थसहाय्य- | - | २८.५० | ०.०० | २८.५० | कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे |
| २.१.२ | विद्यमान बीज परीक्षण प्रयोगशाळांचे बळकटीकरण- | - | १८.०० | ०.०० | १८.०० | |
| २.२ | आधुनिक/प्रगत आनुवंशिक शुद्धता तपासणी सुविधा (१००% केंद्र पुरस्कृत)- | - | | | | |
| २.२.१. | DNA फिंगरप्रिंटिंग/वाण शुद्धता तपासणी प्रयोगशाळा | - | २००.०० | ०.०० | २००.०० | महात्मा फुले कृषी |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | स्थापनेसाठी अर्थसहाय्य: | | | | | विद्यापीठ राहुरी |
| २.२.२ | पारंपारिक पद्धतीद्वारे शुद्धता तपासणीसाठी अर्थसहाय्य: | | | | | |
| २.२.२.१ | आनुवंशिक शुद्धता चाचणी सुविधा बळकटीकरण (Strengthening of Grow-Out Test Farm): | - | ५०.०० | ०.०० | ५०.०० | |
| २.२.२.२ | ग्रीन/नेट/पॉली हाऊस सुविधेसाठी:(Green/Net/ Poly house facility)- | - | १५.०० | ०.०० | १५.०० | |
| २.३ | विशेष बीज आरोग्य तपासणी युनिट (Specialized Seed Health Testing unit) | - | ७०.०० | ०.०० | ७०.०० | |
| २.४ | क्षमता बांधणी (Capacity Building) | - | १०.०० | ०.०० | १०.०० | कृषि आयुक्तालय , महाराष्ट्र राज्य, पुणे |
| २.५ | बियाणे कायद्यांच्या अंमलबजावणीसाठी अर्थसहाय्य (ASSISTANCE FOR STRENGTHENING OF SEED LAW ENFORCEMENT) | - | ५.०० | ०.०० | ५.०० | |
| | **एकुण** -बियाणे गुणवत्ता नियंत्रण घटकांचे बळकटीकरण (Strengthening of Seed quality control components)- (१००:०) | | **३९६.५०** | **०.००** | **३९६.५०** | |
| ३ | राष्ट्रीय बियाणे राखीव (National Seed Reserve) | - | | | | |
| | राखीव बियाण्यांच्या देखभालीचा खर्च(Maintenance Cost) | - | ९०.५३ | ०.०० | ९०.५३ | महाबीज |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | **एकूण** -राष्ट्रीय बियाणे राखीव (National Seed Reserve) | | **९०.५३** | **०.००** | **९०.५३** | |
| **अ** | **एकूण - (१+२+३)** | | **२४१२.१३** | **१२८३.४०** | **३६९५.५३** | |
| ४ | प्रशासकीय, संनियंत्रण व मुल्यमापन खर्च | - | ६०.३० | ३२.०९ | ९२.३८ | |
| ब | **एकूण - (अ+४)** | | **२४७२.४३** | **१३१५.४९** | **३७८७.९१** | |
| ५ | राखीव बियाण्यांच्या देखभालीचा खर्च:(Maintenance Cost) प्रलंबित दायित्व सन २०२४-२५ | | १०२.८७ | ०.०० | १०२.८७ | महाबीज |
| | **एकूणात एकूण (ब+५)** | | **२५७५.३०** | **१३१५.४९** | **३८९०.७८** | |

५. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधीन मार्गदर्शक सूचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरुवातील अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरुपात रकमा विचारात घेता येईल व संदिग्धता राहणार नाहीत.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६) सदर योजनेकरीता मंजूर झालेला निधी हा ज्या संवर्गासाठी मंजूर केलेला आहे त्याच संवर्गासाठी खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर योजनेकरीता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व त्यांच्या कार्यालयातील सहायक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदर निधी खर्च करतांना विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/P.W.D. म्यॅनुअलच्या अधिन राहून/C.V.C.तत्वानूसार/CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च

करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन निर्णय/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहिल.

८. प्रस्तुतचे आदेश राज्यस्तरीय कार्यकारी समितीच्या दि. २४.३.२०२५ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मंजुरीच्या निर्गमित करण्यात येत आहेत.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०५१३१५१३३००१९५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJESH HANMANT PADHYE

Digitally signed by RAJESH HANMANT PADHYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=dc153114bd075a6b1e46ab4a44e410949fb23ba3456957504838af4a35a9b324, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A4545183145BB7CEBA2B281345FCFBF965C36542037F7724F53C8F43E1DBA1D4, cn=RAJESH HANMANT PADHYE
Date: 2025.05.13 15:14:41 +05'30'

**( राजेश पाध्ये )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) मा मंत्री (कृषि) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७) मा. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
१०) संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा) परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१३) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५) सहाय्यक संचालक, लेखा १, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६) अवर सचिव (का-१४३१),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अवरसचिव वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
१८) निवड नस्ती (१-अे)

परिशिष्ट - अ

२.१. १. अ) Cost for purchase of equipment for Seed Testing Laboratory-Pune

| Sr. No. | Equipment | No. Req. | Tentative Rate of Equipment (Rs. in lakh) | Total Amount (Rs. in lakh) |
|---|---|---|---|---|
| १ | Pouch sealing machine | २ | ०.२० | ०.४० |
| २ | Dehumdifier | २ | ०.७५ | १.५० |
| ३ | Computer & Laser Printer | ३ | ०.७५ | २.२५ |
| ४ | Single Pan (Top Loading) | २ | ०.२० | ०.४० |
| ५ | Analytical Balance | १ | ०.५० | ०.५० |
| ६ | Digital weighing balance | २ | ०.०५ | ०.१० |
| ७ | Counting boards | Assorted | ०.२५ | ०.२५ |
| ८ | Sample pans | १० | ०.१० | १.०० |
| ९ | Forceps | १२ | ०.०५ | ०.०५ |
| १० | Magnifires (१०x) | ६ | ०.०० | ०.३५ |
| ११ | Hand sieves | १ set | ०.१५ | ०.१५ |
| १२ | Digital moisture meter | २ | ०.२० | ०.४० |
| १३ | Purity work boards | १० | ०.०४ | ०.३५ |
| १४ | Hot air oven | १ | ०.४० | ०.४० |
| १५ | Autoclave | १ | ०.४० | ०.४० |
| १६ | Sand sterlizer | १ | ०.५० | ०.५० |
| Total | | | | ९.०० |

२.१.१.ब) Cost for purchase of equipment for Seed Testing Laboratory-Nagpur

| Sr. No. | Equipment | No. Req. | Tentative Rate of Equipment (Rs. in lakh) | Total Amount (Rs. in lakh) |
|---|---|---|---|---|
| १ | B. T. Grinder Express Grinder for company B. C. Motors | १ | ३.६६ | ३.६६ |
| २ | Analytical balance ०-६०० gm | १ | ०.७८ | ०.७८ |
| ४ | R. O. water filter for germination paper soaking (२५० lit. capacity) | १ | ०.१७ | ०.०२ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५ | Air conditioner | ३ | ०.४४ | १.३१ |
| ६ | Computer | ३ | ०.९५ | २.८६ |
| ७ | Printer with scanner | १ | ०.९५ | ०.९५ |
| ८ | PH meter | १ | ०.१२ | ०.१२ |
| ९ | Seed herbarium | २ | ०.०८ | ०.१६ |
| Total | | | | १०.०० |

२.१.१.क) Cost for purchase of equipment for Seed Testing Laboratory- Parbhani

| Sr. No. | Equipment | No. Req. | Tentative Rate of Equipment (Rs. in lakh) | Total Amount (Rs. in lakh) |
|---|---|---|---|---|
| १ | Gamet divider | १ | ०.४१ | ०.४१ |
| २ | Single Pan top loading balance | १ | ०.३२ | ०.३२ |
| ३ | Cabinet Germinator double chamber | १ | ३.२५ | ३.२५ |
| ४ | Sand sterlizer | १ | ०.८० | ०.८० |
| ५ | Stereo microscope | १ | ०.८५ | ०.८५ |
| ६ | PH meter | १ | ०.१९ | ०.१९ |
| ७ | Digital Temp. and humidity indicator | १ | ०.२० | ०.२० |
| ८ | Digital Moisture meter | १ | ०.२० | ०.२० |
| ९ | Hand switch | १ | ०.५० | ०.५० |
| १० | Seed herbarium model | १ | १.०० | १.०० |
| ११ | Counting Board | १ | ०.२५ | ०.२५ |
| १२ | Descicator | १ | ०.३३ | ०.३३ |
| १३ | Forecep | १२ | ०.०० | ०.०३ |
| १४ | Magnifier | ६ | ०.१४ | ०.८५ |
| १५ | Petri dish | १० | ०.०० | ०.०१ |
| १६ | Electric Conductivity meter | १ | ०.३१ | ०.३१ |
| | | Total | | ९.५० |

## परिशिष्ट- ब

Cost of Laboratory Equipments for DNA Fingerprinting Laboratory

| Sr. No. | Equipment | No. Req. | Tentative Rate of Equipment (Rs. in lakh) | Total Amount (Rs. in lakh) |
|---|---|---|---|---|
| १ | DNA Electrophororesis system with power supply | ४ | २.०० | ८.०० |
| २ | Gel Documentation Unit with UV Transilluminator | १ | १०.०० | १०.०० |
| ३ | PCR machine / Thermo Cycler | ४ | ३.०० | १२.०० |
| ४ | Table Top, Refrigerated Centrifuge | १ | १०.०० | १०.०० |
| ५ | Micro Centrifuge | १ | २.०० | २.०० |
| ६ | Multipurpose Digital Shaker/Orbital Shaker | १ | २.०० | २.०० |
| ७ | Water Bath | १ | १.५० | १.५० |
| ८ | Rotary Mixture | १ | ०.५० | ०.५० |
| ९ | Heating Blocks | २ | ०.५० | १.०० |
| १० | Water Purification /Double distillation system | १ | ८.०० | ८.०० |
| ११ | Refrigerators | ४ | ०.५० | २.०० |
| १२ | Analytical Balance | २ | १.५० | ३.०० |
| १३ | Biotechnological Plastic wares and Glassware's | - | - | ६.०० |
| १४ | UPS with Batteries | १ | - | १०.०० |
| १५ | Autoclave | २ | २.५० | ५.०० |
| १६ | Computer & Laser Printer | ४ | १.५० | ६.०० |
| १७ | Fluori meter | १ | ०.३५ | ०.३५ |
| १८ | Freezer (-२० to - ८० 'C) | २ | २.५० | ५.०० |
| १९ | Fume hood | १ | १.५० | १.५० |
| २० | Hot Air Oven | १ | २.०० | २.०० |
| २१ | Hot plate cum stirrer | १ | ०.४० | ०.४० |
| २२ | Liquid nitrogen can | २ | १.०० | २.०० |
| २३ | Microwave oven | २ | ०.३० | ०.६० |
| २४ | pH meter | १ | ०.१५ | ०.१५ |
| २५ | Micropipettes | - | ५.०० | ५.०० |
| २६ | UV Spectrophotometer | १ | ५.०० | ५.०० |
| २७ | Real Time § PCR with Accessories | १ | २०.०० | २०.०० |
| २८ | Ice Flake Machine | १ | २.०० | २.०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २९ | Vortex Mixer | २ | ०.५० | १.०० |
| ३० | Laminar Air Flow Chamber | २ | १.५० | ३.०० |
| ३१ | Renovation for Molecular Work Lab (Including installation of ACs, Dehumidifiers etc) | - | १५.०० | १५.०० |
| ३२ | Miscellaneous | - | ५०.०० | ५०.०० |
| | Total | | | २००.०० |

परिशिष्ट- क

Costs for strengthening of grow out test farms : (२ ha)

STRENGTHENING OF GROW OUT TEST FARM

| S. No | Activity/Particulars | Amount (Rs.in lakh) |
|---|---|---|
| १ | Essential civil works at site- sheds, stores, pump houses, workshop, road, fencing, electrification, drying platforms, threshing yards buildings etc. for the Centre. | १०.०० |
| २ | Irrigation/drainage setup, pipelines, water tanks, slab channels etc. | १०.०० |
| ३ | Land development, leveling, mapping, topography adjustments, bounding, plot lay out, etc | १०.०० |
| ४ | Mould board plough, disc harrow, tillers, levelers, rigger, bund former and such other implements/farm machinery, essential tools for repair and maintenance with trolley. Tractor ३५ HP-१ etc. | १५.०० |
| ५ | Mobility for field visit- hiring of one jeep, one motorcycle and २ bicycles | ५.०० |
| | Total | ५०.०० |

परिशिष्ट- ङ

CREATION OF GREEN HOUSE FACILITIES Annexure IX ( Amount in Rs.)

| S.N. | Product and Specifications/Technical Details | Rate of Equipment (Rs. in lakh) |
|---|---|---|
| १. | Photo-synthetically Active Radiation Lamp | ३.०० |
| २. | Normal Tube Lights | ०.२५ |
| ३. | Microprocessor Photosynthesis Monitor-panel | ०.८७५ |
| ४. | Water-pad Cooling System | ०.८७५ |
| ५. | Heating System (by electric heat convector system) | ०.७५ |
| ६. | Piltz Timer (for humidity) | ०.२५ |
| ७. | Misting Unit (heavy duty motor with nozzles, filter, pipes sintex polymer tank १००० litre) | १.५० |
| ८. | Polycarbonate Sheet Double Walled (६ mm thick) | १.०० |
| ९. | Roof Screen ५०% (Shading) Colour Green Manually Rollable | ०.३५ |
| १०. | Super Structure Module Aluminium Anodized Covering Strip Infra Structure | ०.५० |
| ११. | Benching System Size {९' x ४' x २' (LxWxH)} Mild Steel Rust Resistant with Movable Top | १.०० |
| १२. | Foundation of Green House | १.५० |
| १३. | Flooring of Green House (with crushed stone or gravel) | ०.७५ |
| १४. | Electrical Wiring (of entire Green House) and other works | १.१५ |
| १५. | Pro Tray ५० Cells (५० No) | ०.७५ |
| १६. | Miscellaneous | ०.५० |
| | Total | १५.०० |

# परिशिष्ट- इ

COST OF EQUIPMENTS FOR SEED HEALTH TESTING LABORATORIES Annexure-X

| S. N. | Equipment | No. Required | Amount in Rs. in lakh | |
|---|---|---|---|---|
| | | | Rate of Equipment | Total |
| १ | Refrigerated Centrifuge (up to २०,००० rpm) | १ | ८.०० | ८.०० |
| २ | Centrifuge Table Top (up to ५,००० rpm) | १ | १.५० | १.५० |
| ३ | Clean Bench | १ | १.०० | १.०० |
| ४ | Automatic Rotary Shaker | १ | ०.७५ | ०.७५ |
| ५ | Double Distillation Apparatus | १ | २.०० | २.०० |
| ६ | Incubation Chambers (२५-३२°C) | १ | ४.०० | ४.०० |
| ७ | NUV Incubator (२१'C) (with automatic time switch for lamps) | १ | ०.७५ | ०.७५ |
| ८ | Bacteriological Incubators | १ | ०.७५ | ०.७५ |
| ९ | Haemocytometer | १ | ०.३० | ०.३० |
| १० | Growth Chamber of Standard Size | १ | ३.५० | ३.५० |
| ११ | Filtration Apparatus | १ | १.०० | १.०० |
| १२ | Electrostatic Air Cleaner | १ | १.५० | १.५० |
| १३ | Phase-Contrast Microscope | १ | ३.०० | ३.०० |
| १४ | Fluorescence Microscope | १ | ३.०० | ३.०० |
| १५ | Universal ELISA Plate Reader (EL x ८०० Ms) | १ | ३.०० | ३.०० |
| १६ | Immuno-Blotter & Accessories | १ | १.५० | १.५० |
| १७ | Advanced Laminar Flow | १ | १.५० | १.५० |
| १८ | Electrophoresis & Gel Documentation System | १ | ३.०० | ३.०० |
| १९ | Western Blot | १ | १.०० | १.०० |
| २० | UV-Spectrophotometer | १ | २.५० | २.५० |
| २१ | Ultra-microtome | १ | २.०० | २.०० |
| २२ | Millipore Water Purification Unit (with Bacteriological Filter) | १ | १.५० | १.५० |
| २३ | Elisa Microplate Washer (EL x ४०५ Select) - ९६ Well | १ | ०.५० | ०.५० |
| २४ | Microplate Dispenser (९६ Well) | १ | ०.५० | ०.५० |
| २५ | pH meter (Table Top & Digital) | १ | ०.५० | ०.५० |
| २६ | Shaking Incubator | १ | १.५० | १.५० |
| २७ | Micropipettes | १ Set | ०.५० | ०.५० |
| २८ | Blender/Mixer Reputed Brand | १ | ०.५० | ०.५० |
| २९ | Autoclave (Vertical) | १ | ०.५० | ०.५० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ૩૦ | Kits for Total Aflatoxins, Deoxynivalenol, Total Fumonisins, Ochratoxin A, T-૨ Toxin and Zearalenone, Mycotoxin Tests. | ૧ | ૬.૦૦ | ૬.૦૦ |
| ૩૧ | Allergen ELISA Test Kit | ૧ | ૦.૭૫ | ૦.૭૫ |
| ૩૨ | Grinding Machine | ૧ | ૧.૨૦ | ૧.૨૦ |
| ૩૩ | Microscope (with Image Analyser) | ૧ | ૨.૫૦ | ૨.૫૦ |
| ૩૪ | Renovation of Lab | - | ૮.૦૦ | ૮.૦૦ |
| | | | Total | ૭૦.૦૦ |

परिशिष्ट – ई

MSSCL PROPOSAL ANNUAL ACTION PLAN FOR NSR UNDER "KRISHI UNNATI YOJNA" FOR KHARIF &RABI २०२५-२६ SEASON

CATEGORY OF SEED :FOUNDATION (KHARIF SEASON)

| SR. NO | NAME OF IMPLEMENTING AGENCY | CROP | PROPOSED QTY. TO BE MAINTAINED FOR २०२५-२६ (qtl) | PROPOSED AMOUNT (Qty Maintained x Rs. ५१० per qtls) in Rs. lakh |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | MAHARASHTRA STATE SEEDS CORPORATION LIMITED, AKOLA (M.S.) | SOYBEAN | ३०.०० | ०.१५ |
| २ | | PADDY | ८०.०० | ०.४१ |
| ३ | | UDID | २०.०० | ०.१० |
| ४ | | ARHAR | ३०.०० | ०.१५ |
| ५ | | MOOG | ४०.०० | ०.२१ |
| | Kharif (FS) Total | | २००.०० | १.०२ |
| CATEGORY OF SEED : CERTIFIED (KHARIF SEASON) | | | | |
| १ | MAHARASHTRA STATE SEEDS CORPORATION LIMITED, AKOLA (M.S.) | SOYBEAN | २०००.०० | १०.२० |
| २ | | PADDY | २५००.०० | १२.७५ |
| ३ | | UDID | १०००.०० | ५.१० |
| ४ | | ARHAR | १५००.०० | ७.६५ |
| ५ | | MOOG | ५००.०० | २.५५ |
| ६ | | MAIZE | १००.०० | ०.५१ |
| | Kharif (CS) Total | | ७६००.०० | ३८.७६ |
| | Kharif Total (CS+FS Total) | | ७८००.०० | ३९.७८ |
| CATEGORY OF SEED : FOUNDATION (RABI SEASON) | | | | |
| १ | MAHARASHTRA STATE SEEDS CORPORATION LIMITED, AKOLA (M.S.) | SORGHUM | ५०.०० | ०.२६ |
| २ | | WHEAT | २००.०० | १.०२ |
| ३ | | GRAM | २००.०० | १.०२ |
| | Rabi (FS) Total | | ४५०.०० | २.३० |
| CATEGORY OF SEED : CERTIFIED (RABI SEASON) | | | | |
| १ | MAHARASHTRA STATE SEEDS CORPORATION LIMITED, AKOLA (M.S.) | SORGHUM | २००० | १०.२० |
| २ | | GRAM | ४००० | २०.४० |
| ३ | | WHEAT | ३५०० | १७.८५ |
| | Rabi (CS) Total | | ९५०० | ४८.४५ |
| | Rabi Total (Total CS+FS) | | ९९५० | ५०.७५ |
| | Grand Total (Kh+Rb २०२५-२६) | | १७७५०.०० | ९०.५३ |